विधानसभा सार्वत्रिक निवडणुक-२०१९ करीता बंदोबस्तासाठी पोलीस कर्मचा-यांची ने-आण करण्यासाठी राज्य परिवहन महामंडळाच्या पुणे, जालना व लातूर विभागाकडून प्रासंगिक करारावर घेण्यात आलेल्या बसेसच्या देयकाची रक्कम रुपये ६,५४,७५०/- अदा करण्याच्या प्रस्तावास मंजूरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण ०९२०/प्र.क्र.८४/ विशा १ अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०२०.

संदर्भ :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं /३०/३५७७/ वाह.अधि./ एस.टी.बस/२९/२०२० दिनांक ०५.०८.२०२०

प्रस्तावना :-

विधानसभा सार्वत्रिक निवडणुक-२०१९ करीता बंदोबस्तासाठी पोलीस अधिकारी/ कर्मचा-यांची ने-आण करण्यासाठी राज्य परिवहन महामंडळाच्या पुणे, जालना व लातूर विभागाकडून प्रासंगिक करारावर बसेस अधिगृहित करण्यात आल्या होत्या. सदरच्या अधिगृहित करण्यात आलेल्या बसेसच्या देयकाची रक्कम रुपये ६,५४,७५०/- (रुपये सहा लाख चोपन्न हजार सातशे पन्नास फक्त) इतक्या देय असलेल्या रक्कमेस शासन मंजूरी मिळण्याबाबत व सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम खर्च करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

विधानसभा सार्वत्रिक निवडणुक-२०१९ करीता कायदा व सुव्यवस्था राखण्याच्या अनुषंगाने बंदोबस्ताकरीता पोलीस अधिकारी/कर्मचा-यांची ने-आण करण्यासाठी राज्य परिवहन महामंडळाच्या पुणे, जालना व लातूर विभागाकडून शासन नियमाप्रमाणे प्रासंगिक करारावर घेण्यात आलेल्या राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसच्या देयकाची रक्कम रुपये ६,५४,७५०/- (रुपये सहा लाख चोपन्न हजार सातशे पन्नास फक्त) वित्तीय वर्ष २०२०-२०२१ च्या विहित लेखाशिर्षाखालील शिल्लक अनुदानातून अदा करण्यास मंजूरी देत आहे.

सदरचा खर्च मागणी क्र. “बी-१, २०५५-पोलीस, १०९-जिल्हा पोलीस, (००) (०१)-जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८), इतर खर्च-५०” या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तिय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अनुक्रमांक ६, नियम-४०(१) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१०२७१४५३०२५५२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Deepak
Tukaram Kharat

Digitally signed by Deepak Tukaram Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=902e21bb580b52a1e246b37b697ca20f0db2834da41f6840afd03916d8ed1b76, serialNumber=d8bd67045829179609f51b88a183cd0a4a3acd98db48b22b5faf5a9efc780e70, cn=Deepak Tukaram Kharat
Date: 2020.10.27 14:54:50 +05'30'

**( दि. तु. खरात )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२.महालेखापाल- १ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
४.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.निवडनस्ती.